**इयत्ता १ली ते इयत्ता १२वी पर्यंतच्या विशेष गरजा असणाऱ्या दिव्यांग विद्यार्थ्यांच्या अध्ययन शैलीनुसार मूल्यांकनाबाबत व शैक्षणिक सवलती संदर्भात मार्गदर्शन सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१७/(११८/१७)/एस.डी-६,**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई, ४०० ०३२.
दिनांक : १६ ऑक्टोबर,२०१८

<u>संदर्भ</u> : १) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग क्र.संकीर्ण २०२१/(१५/०१)/प्राशि-५, १३.११.२००१.
२) शासन परिपत्रक, शालेय शिक्षण विभाग क्र.संकीर्ण १०२१/(१५/०१)/प्राशि-५, दि.२३.०६.२००३.
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग एसएससी १०१९/(१५१/९९)/उमाशि-२, दि.२८.११.२०००.
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग क्र.संप्रप २००६/(२३१/०६)/प्राशि-५, दि.०७.०९.२००६.
५) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग क्र. शैगुवि-२०१५/( ८०/१५)/एसडी-६,दि. २२.०६.२०१५
६) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग क्र.संक्रीर्ण २०१५/(११९-अ)/एसडी-६, दि.०८.०१.२०१६
७) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग क्र.संक्रीर्ण २०१५/(११९-अ)/एसडी-६, दि.१५.०२.२०१६
८) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग क्र.संक्रीर्ण २०१६/प्र.क्र. १९५-अ)/एसडी-६, दि.११.०१.२०१७
९) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. अप्रवि-२०१८/प्र.क्र.४६/आरोग्य-६ दि.१४.०९.२०१८

<u>प्रस्तावना</u> :-

दिव्यांग व्यक्तींचा अधिकार अधिनियम, २०१६ (Right of Person With Disability Act (RPWD) संदर्भात केंद्र शासनाने दि.२८ डिसेंबर ,२०१६ रोजी अधिसूचना निर्गमित केली आहे. या अधिनियमातील प्रकरण ३, शिक्षण, कलम १६ व १७ व प्रकरण ६ कलम ३१ व ३२ मध्येही RTE Act, २००९ चा संदर्भ नमूद करुन विशेष शैक्षणिक गरजा असणाऱ्या बालकांमध्ये कोणताही भेदभाव न करता समावेशित शिक्षणाद्वारे सर्व विद्यार्थ्यांना शिक्षणाच्या मुख्य प्रवाहात आणण्याबाबत नमूद केले आहे.

बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा अधिकार, अधिनियम, २००९ व भारतीय संविधान कलम ४५ नुसार शिक्षण हा प्रत्येक मुलाचा मूलभूत हक्क आहे. वय वर्षे ६ ते १४ वर्षांच्या प्रत्येक बालकास व विशेष गरजा असणाऱ्या विद्यार्थ्यांना वयाच्या १८ वर्ष वयोगटापर्यंत मोफत व सक्तीचे शिक्षण विषयक सुविधा देणे आवश्यक आहे. शिक्षण विभाग अध्ययनार्थी दृष्टीकोनातून सर्वच बालकांकडे बघत असून त्यांच्याकडून अपेक्षित बदल व अध्ययन निष्पत्ती येणे आवश्यक असते यासाठी काम करत असते. त्यानुषंगाने समावेशित शिक्षणाची संकल्पना, तत्त्वानुसार व काळानुरूप होणाऱ्या बदलानुसार समावेशित शिक्षणाकडून सामान्यीकरणाकडे वाटचाल करण्यासाठी ही संकल्पना भविष्यात विकासात्मक परिवर्तनानुसार निरंतर सुरु राहणे ही काळाची गरज आहे.

त्यानुषंगाने विशेष गरजा असणाऱ्या (दिव्यांग) विद्यार्थ्यांचे अध्ययन, अध्यापन पध्दती व मूल्यमापनाची तंत्रे ही देखील विविध अध्ययन शैलीनुसार श्रवण, दृष्य, स्पर्श, बहु अध्ययन शैली (Audio Learner, Visual Learner, Kinaesthetic Learner, Multi Learner) इ. अध्ययन शैलीनुसार असणे आवश्यक आहे. त्यासाठी अध्ययन

शैलीनुसार Facilitator म्हणून वर्ग शिक्षकांनी अध्यापन करण्याची गरज आहे. विशेष गरजा असणाऱ्या (दिव्यांग) म्हणजे अंशत: अंध/पूर्णत: अंध, कर्णबधीर, भाषा व वाचादोष, अस्थिव्यंग, मानसिक आजार, अध्ययन अक्षम, सेरेब्रल पाल्सी, स्वमग्न, बहुविकलांग, कुष्ठरोग निवारित, शारिरीक वाढ खुंटणे, बौध्दिक अक्षम (मतिमंद), स्नायूंची विकृती, मज्जासंस्थेचा तीव्र आजार, मल्टीपल स्क्लेरॉसिस (Multiple Sclerosis), थॅलस्सेमिया, हिमोफेलिया, सिकल सेल आजार, ॲसिड ॲटॅक व्हिक्टिम, पार्किनसन्स आजार इ. २१ प्रवर्गातील व इतर आव्हानात्मक परिस्थितीत आढळून आलेल्या विद्यार्थ्यांना नजिकच्या शाळेत शिक्षण देताना सुयोग्य अध्ययन शैलीचा उपयोग करतांना गोष्टींचा सखोल अभ्यास होणे आवश्यक आहे. म्हणून वेगळ्या अध्ययन शैलीच्या गरज असणाऱ्या विद्यार्थ्यांचे इतर सामान्य विद्यार्थ्यांच्या बरोबरीने प्रत्येक घटकामध्ये मूल्यमापन न करता त्यांच्या अध्ययन शैलीनुसार ज्ञानाच्या, भाषेच्या मूल्यमापनाच्या पध्दती विकसित असणे अपेक्षित आहे.

संदर्भित शासन निर्णयाव्दारे विशेष गरजा असणाऱ्या (दिव्यांग) विविध बहु अध्ययनशैलीच्या विद्यार्थ्यांसाठी सर्वसाधारण विद्यार्थ्यांना असलेल्या परिक्षा योजनेप्रमाणे मूल्यांकन न करता परीक्षा पध्दतीमध्ये अनुकूलन (Adaptive Approach) करुन देणे आवश्यक आहे. परिणामी Facilitator / शिक्षक यांनी अध्यापन केलेल्या व उपयोगात आणलेल्या मूल्यांकन पध्दतीमध्ये विद्यांर्थ्यामध्ये प्रगती चांगली दिसून येईल व शिक्षकांमध्ये आनंद, विश्वास व स्वयंप्रेरणा दिसून येईल. या विद्यार्थ्यांना नवनवीन अभ्यास क्षेत्रांची ओळख होणे, बुध्दी कौशल्य, उद्यमशीलता या सर्व बाबींचा म्हणजेच सर्वंकष अभ्यास होणे आवश्यक आहे .

याकरिता या विशेष शैक्षणिक गरजा असणाऱ्या (दिव्यांग) बहु अध्ययन शैलीच्या विद्यार्थ्यांना नजिकच्या शाळेत सर्व मुलांबरोबर एकत्रित शिक्षण घेता यावे, याकरिता प्राथमिक स्तरावर इयत्ता १ ली ते इयत्ता ८ वी करिता सर्व शिक्षा अभियान (दिव्यांग) समावेशित शिक्षण (IED Inclusive Education for Disabled) व इयत्ता ९ वी ते इयत्ता १२ वी पर्यंतच्या विद्यार्थ्यांकरिता राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान - (दिव्यांग) समावेशित शिक्षण माध्यमिक स्तर (IEDSS-Education for Disabled at Secondary State) सुरु करण्यात आलेले होते. या सर्वाचा विचार आता एकत्रितपणे समग्र शिक्षा अभियानातंर्गत पूर्व प्राथमिक ते उच्च माध्यमिक स्तरापर्यंत समतात्मक दृष्टीकोनातून गुणात्मक समानता साध्य करण्यासाठी होत आहे. या विद्यार्थ्यांचे मूल्यमापन व परीक्षा पध्दती अध्ययन शैलीनुसार (Learning Style) असणे आवश्यक आहे. यासाठी विशेष गरजा असणाऱ्या (दिव्यांग) विद्यार्थ्यांचे मूल्यमापन व परीक्षा पध्दतीमध्ये समतात्मक दृष्टीकोनातून अध्ययन शैलीनुसार अनुकूलन Adaptation करुन समाजातील उत्पादनशील घटक म्हणून समान पातळीवर आणणे हा देखील यामागील मुख्य उद्देश आहे.

विशेष गरजा असणाऱ्या (दिव्यांग) विद्यार्थ्यांना अध्ययन अध्यापन व मूल्यमापनामध्ये गरजेनुसार अध्ययनार्थी दृष्टीकोनातून अध्ययनशैलीनुसार अध्यापन व अनुकूलित (Adaptive) मूल्यांकन पध्दतीचा उपयोग करण्यासंदर्भात शासन स्तरावरुन समिती गठीत करण्यात आली होती. या समितीच्या शिफारशीनुसार इयत्ता १ली ते इयत्ता १२ वी पर्यंतच्या विद्यार्थ्यांना अध्ययन शैलीनुसार सुलभ अध्ययन व अध्यापन व अनुकूलित (Adaptive) मूल्यांकन पध्दतीचा व शैक्षणिक सवलतींचा उपयोग करण्यात यावा ही बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुसार खालील निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे दिनांक ८ जानेवारी, २०१६, दिनांक १५ फेब्रुवारी, २०१६ व दिनांक ११ जानेवारी, २०१७ रोजीचे शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असून या सर्व शासन निर्णयातील तरतूदींचा विचार करुन सर्व समावेशक एकच शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

समावेशित शिक्षण संकल्पनेनुसार अध्ययनार्थी दृष्टीकोनातून ग्रामीण, दुर्गम, अतिदुर्गम, निमशहरी व शहरी भागांतील इयत्ता पूर्व प्राथमिक ते १२वी पर्यंतच्या विशेष गरजा असणाऱ्या अंशत: अंध/पूर्णत: अंध, कर्णबधीर, भाषा व वाचादोष, अस्थिव्यंग, मानसिक आजार, अध्ययन अक्षम, सेरेब्रल पाल्सी, स्वमग्न, बहुविकलांग, कुष्ठरोग निवारित, शारिरीक वाढ खुंटणे, बौध्दिक अक्षम (मतिमंद), स्नायुची विकृती, मज्जासंस्थेचा तीव्र आजार मल्टीपल स्क्लेरॉसिस (Multiple Sclerosis), थॅलस्सेमिया, हिमोफेलिया, सिकल सेल आजार, ॲसिड ॲटॅक व्हिक्टिम, पार्किनसन्स आजार इ. २१ प्रवर्गातील व इतर आव्हानात्मक परिस्थिती आढळून आलेली बालके शिक्षणापासून वंचित राहू नयेत. तसेच त्यांना सर्वांसोबत शिक्षणाच्या मुख्य प्रवाहात टिकवून ठेवण्यासाठी नजिकच्या सर्व व्यवस्थापनांच्या नियमित शाळेतच प्रवेश, आवश्यकतेनुसार विद्यार्थ्यांना अध्यापन सहाय्यभूत सेवा, अनुकूलित परिक्षा / मुल्यांकन पध्दती व शिक्षकांना मार्गदर्शन तसेच क्षेत्रीय यंत्रणा व समुदायाचे सक्षमीकरण करणे, हे प्रमुख उद्दिष्ट आहे.

इयत्ता पूर्व प्राथमिक ते १२ वी पर्यंतच्या विशेष शैक्षणिक गरजा असणाऱ्या विद्यार्थ्यांचे इतर सामान्य विद्यार्थ्यांच्या बरोबरीने प्रत्येक घटकामध्ये मूल्यमापन / मूल्यांकन न करता त्यांच्या अध्ययन शैलीनुसार ज्ञानाच्या, भाषेच्या / विषयवार अनुकूलित अध्यापन मूल्यमापनाच्या पध्दती उपयोगात आणणे अपेक्षित आहे. प्राथमिक व उच्च प्राथमिक स्तरावर (इयत्ता १ली ते ८वी) पर्यंतच्या विद्यार्थ्यांच्या शाळांमधील सर्व प्रकारच्या परिक्षांचे / मूल्यांकनासाठी, सातत्यपूर्ण सर्वंकष मूल्यमापन आणि माध्यमिक व उच्च माध्यमिक स्तरावरील (इयत्ता ९वी ते १२वी) पर्यंतच्या परीक्षा पध्दतीमध्ये अनुकूलित मूल्यमापन / मूल्यांकन पध्दतीचा उपयोग करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यासाठी अध्ययन शैलीनुसार अनुषंगीक व्यवस्था व शैक्षणिक सवलतींचा उपयोगास देखील मान्यता देण्यात येत आहे.

समावेशनामध्ये केवळ विशेष गरजा असणाऱ्या विद्यार्थ्यांचा समावेश नसून इतर घटकातही शिक्षणात आव्हाने येणाऱ्या विद्यार्थ्यांचा समावेश आहे. त्यामुळे ज्या ज्या बालकांना शिक्षणात आव्हाने येतात, त्यांची आव्हाने कमी करुन त्यांना शिक्षणाच्या मुख्य प्रवाहात टिकवून ठेवण्यासाठी मानवी अधिकारानुसार प्रत्येक व्यक्तीमध्ये सार्वत्रिक मानवता भाव निर्माण करणे व सर्व मुले शिकू शकतात, ही भावना दृढ करण्यासाठी समावेशनाबाबतची संकल्पना "समतेतून समानता" आणण्यासाठी या शासन निर्णयानुसार पुढील काही उद्दिष्टे निश्चित करण्यात येत असून, त्यानुषंगाने सूचना देण्यात येत आहेत.

**<u>१. उद्दिष्टे</u>**

१.१ शिक्षण हक्क कायद्यानुसार १८ वर्षे वयोगटापर्यंतच्या विशेष गरजा असणारे बालकांचे समतेतून समानता व गुणवत्ता वाढविणे. १०० टक्के अध्ययनार्थी कोणत्या तरी एक शब्दामध्ये / संकल्पनामध्ये अडतात, त्यांना आव्हाने येतात अशा वेळी प्रत्येक विद्यार्थ्याला कोठे ना कोठे मार्गदर्शनाची गरज असते, ते विशेष मार्गदर्शन त्यांना दिले गेले नाही तर ते तेथेच थांबतात व त्यांच्या पुढील संकल्पना स्पष्ट न झाल्याने पर्यायाने शाळाबाह्य / समाजबाह्य होतात. त्यामुळे कोणत्याही बालकांना असमर्थाचे लेबल न लावता सर्व मुले शिकू शकतात,अशा प्रकारची भावना सर्व शिक्षकांमध्ये दृढ करणे.

१.२ दिव्यांग विद्यार्थ्यांची क्षमता / गरज विचारात घेऊन उपलब्ध अध्ययन शैलीची निश्चिती वर्गशिक्षकांनी करावी. उपयुक्त शैलीची शास्त्रीयदृष्ट्या येणारे नवीन बदल समजून घेऊन शिक्षकांनी दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी आधुनिक अध्ययन अध्यापन पध्दतीचा वापर करणे.

१.३ दिव्यांग विद्यार्थ्यांच्या पालकांमध्ये सुरक्षिततेची भावना निर्माण करून ते आपल्या पाल्यांना शाळेत शिकण्यास प्रोत्साहन करतील. आपले मूलही शिकू शकते, असा आत्मविश्वास पालकांमध्ये निर्माण करणे.

१.४ शाळा व्यवस्थापन समित्या गरजाधिष्ठित विद्यार्थ्यांला सुलभ अध्ययनासाठी लागणाऱ्या साहित्याची उपलब्धता समाज सहभागातून करतील. तसेच सर्व उपलब्ध शैक्षणिक / वैद्यकिय सुविधा / सवलतींची माहिती दिव्यांग विद्यार्थ्यांच्या पालकांना देतील.

१.५ रिसोर्स टिचर, यांच्या सहकार्याने वर्गशिक्षकांने दिव्यांग विद्यार्थ्यांचे अध्ययन योग्यरित्या होईल यासाठी प्रयत्न करावेत.

(२) प्रपत्र "अ" मध्ये नमूद दिव्यांग प्रवर्गातील विद्यार्थ्याकरिता आवश्यक अध्ययन / शैक्षणिक सवलती / सुविधा शासन निर्णयान्वये लागू राहतील. या दिल्या गेलेल्या सवलतींचा गरजेनुसार वापर करण्यात यावा. या सवलतींचा वापर अध्ययनास पूरक म्हणून वापरण्यात याव्यात. जेणेकी, तो स्वयं अध्ययनाकरीता देखील प्रोत्साहित होईल. इयत्ता १ ली ते ८ वी तील विदयार्थ्यांचे सातत्यपूर्ण सर्वंकष मूल्यमापन करताना नमूद केलेल्या ८ तंत्रांपैकी विद्यार्थ्यांची क्षमता पाहून योग्य तंत्र निवडून मूल्यमापन करावे. तसेच महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाने / महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांनी निर्धारित केलेल्या विषयांपैकी कोणतेही मुख्य विषय / ग्रेडड विषय निवडण्याचे अधिकार दिव्यांग विद्यार्थ्यांना राहतील.

(३) शाळा स्तरावर त्यांच्या पालकांच्या अर्जाच्या विचार करुन, विषयांची मुभा देण्याचे अधिकार शाळांच्या मुख्याध्यापकांना राहतील.

(४) सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने विषय योजनेबाबत आवश्यक पुढील सूचना महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाने / महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे याच्यातर्फे सर्व शाळांच्या मुख्यध्यापकांना देण्यात याव्यात.

(५) महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाच्या परिक्षेस बसणाऱ्या दिव्यांग विद्यार्थ्यांच्या दिव्यांग प्रकाराचे सांकेताक कोडिंग त्यांच्या उत्तर प्रत्रिकेवर होणे गरजेचे आहे. त्यानुसार आवश्यक कार्यवाही महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ पुणे यांच्यातर्फे करण्यात यावी.

(६) दिव्यांग विद्यार्थ्यांकरीता दिल्या जाणाऱ्या शैक्षणिक सवलती / सोयी सुविधा या संदर्भातील मार्गदर्शक सूचना व त्यानुषंगाने आवश्यक नियोजन महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे येथील समता विभागामार्फत करण्यात येतील. दिव्यांगत्वाच्या प्रकारानुसार उपयुक्त अध्ययनशैलीच्या माहितीबाबतच्या सूचना महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांच्या मार्फत देण्यात याव्यात.

(७) दिव्यांग विद्यार्थ्यांची नोंदणी सरल या संगणक प्रणालीमध्ये (दिव्यांग प्रकारानिहाय) करण्यात यावी.

(८) वैद्यकिय प्रमाणपत्र मिळेपर्यंत शालेय स्तरावर मुख्याध्यापक व शिक्षकांनी मूल्यमापन करून त्यांना योग्य त्या शैक्षणिक सुविधा (प्रपत्र "अ" व "ब") त्यांच्या अधीन राहून द्याव्यात.

(९) दिव्यांग विद्यार्थ्यांच्या वैद्यकिय तपासणी व मूल्यमापन व प्रमाणपत्राकरीता आवश्यक निकष सार्वजनिक आरोग्य विभागाच्या क्र. अप्रवि-२०१८/प्र.क्र.४६/आरोग्य-६ दि. १४ सप्टेंबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये नमूद करण्यात आले आहे. तसेच रुग्णालयाची नावे नमूद करण्यात आली आहेत. त्यानुसार

शाळांच्या मुख्याध्यापक / पालक यांनी संक्षयित (At- Risk)दिव्यांग विद्यार्थ्यांची आवश्यकतेनुसार तपासणी करावी.

(१०) प्रपत्र "अ" व "ब" मध्ये नमूद करण्यात आलेल्या शैक्षणिक सवलती / सुविधा शालेय विद्यार्थी व १० वी व १२ वीच्या विद्यार्थ्यांना सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षापासून लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१०१६१८०६४६८३२१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vandana Krishna
Date: 2018.10.19 17:15:33 +05'30'

**(वंदना कृष्णा)**

अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई.
३) मा. सभापती, विधान परिषद, यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
४) मा, अध्यक्ष, विधानसभा, यांचे खाजगी सविच, विधानभवन, मुंबई.
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६) मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव.
७) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
८) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९) अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव, वैद्यकिय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) आयुक्त (शिक्षण), शिक्षण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
१५) आयुक्त, दिव्यांगजन कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७) अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१८) शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१९) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे.
२०) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२१) संचालक, वैद्यकिय शिक्षण व संशोधन, संचालनालय, मुंबई.
२२) सहसंचालक / उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे सर्व.
२३) अध्यक्ष/सचिव, आय.सी.एस.ई.,नवी दिल्ली.
२४) अध्यक्ष/सचिव, केंद्रिय माध्यमिक शिक्षण मंडळ.
२५) विभागीय अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, सर्व विभाग.
२६) विभागीय सचिव, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, सर्व विभाग.
२७) विभागीय शिक्षण उपसंचालक, सर्व विभाग.

२८) विभागीय आरोग्य सेवा उपसंचालक, सर्व विभाग.
२९) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये, सर्व
३०) अधिष्ठाता, वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालय (सर्व संबंधित रुग्णालये)
३१) संचालक, ऑल इंडिया इन्स्टिटयुट ऑफ फिजिकल मेडिसन ॲन्ड रिहॅबिलीटेशन हाजी अजी मुंबई.
३२) संचालक, अलीयावर जंग राष्ट्रीय श्रवण दिव्यांगजन संस्था, बांद्रा, मुंबई.
३३) अधिष्ठाता, केईएम रुग्णालय, मुंबई,
३४) अधिष्ठाता, बा.य.ल नायर रुग्णालय, मुंबई.
३५) अधिष्ठाता, लो.टि. बैद्यकिय महाविद्यालय, सायन रुग्णालय, मुंबई.
३६) शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/निरंतर), जिल्हा परिषद, सर्व.
३७) जिल्हा शल्य चिकित्सक, सर्व
३८) जिल्हा आरोग्य अधिकारी सर्व.
३९) वैद्यकिय अधिक्षक, ग्रामिण रुग्णालय, उप जिल्हा रुग्णालय, सर्व.
४०) प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था सर्व.
४१) शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई महानगरपालिका.
४२) शिक्षणाधिकारी/प्रशासनाधिकारी, महानगरपालिका, सर्व.
४३) निवड नस्ती, एस-६.

## प्रपत्र "अ"

**(१) अंशत: अंध/पूर्णत: अंध विद्यार्थ्यांकरिता:-**

१.१ विद्यार्थ्यांच्या सोयीनुसार जवळचे परीक्षा केंद्र देय राहील (विद्यार्थी ज्या शाळेत शिक्षण घेत आहेत, ती शाळा किंवा घराजवळची शाळा).

१.२ या विद्यार्थ्यांना परीक्षेचा पेपर सोडविण्यासाठी प्रतितास २० मिनिटे अधिक वेळ देय राहील.

१.३ अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना कमाल २० गुणांची सवलत एकाच विषयामध्ये किंवा सर्व विषयांमध्ये विभागून देण्यात यावी.

१.४ वैद्यकिय प्रमाणपत्रानुसार लेखनिकाची गरज असल्यास लेखनिक घेण्याची परवानगी देण्यात यावी.

१.५ शालेय स्तरावर इयत्ता १ ली ते ९ वी ही सुविधा गरजेनुसार व इयत्ता १० वी व १२ वी परीक्षेत प्रविष्ठ होणाऱ्या विद्यार्थ्यांना गणित सर्व शाखा, पुस्तक पालन लेखाकर्म, भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र या विषयांसाठी आवाजाच्या गणकयंत्राचा कॅलक्युलेटर (Talking Calculator) वापरण्याची इच्छा असेल तर कॅलक्युलेटर वापरता येईल. (शालेय स्तरावर या साहित्याची गरज भासते)

१.६ अंशत: अंध विद्यार्थ्यांसाठी मोठ्या अक्षरातील (Arial २० Size) प्रश्नपत्रिका छापण्यात यावी.

१.७ विज्ञान व तंत्रज्ञान (पेपर १ व २) या विषयांच्या प्रात्यक्षिक परीक्षेऐवजी या विद्यार्थ्यांना या विषयाची तोंडी परीक्षा देता येईल. तोंडी परीक्षेत प्रात्यक्षिकांवर आधारित प्रश्न विचारले जावेत.

१.८ परीक्षा कालावधीमध्ये गणितीय पाटीचा (Trailer Frame) वापर करता येईल.

१.९ अंशत: अंध विद्यार्थ्यांना उत्तरपत्रिका लिहिण्यासाठी स्केच पेनचा व प्रश्नपत्रिका वाचण्यासाठी ग्लास मॅग्निफायरचा वापर करता येईल.

१.१० परीक्षेच्या वेळी गरजेनुसार अॅबॅकस व भूमितीय साहित्य साधनांचा वापर करता येईल.

१.११ आकृत्या, नकाशे इ. काढण्यासाठी सवलत देय राहील. याचे गुण त्या विद्यार्थ्याला प्रमाणात देण्यात येतील.

१.१२ जर एखाद्या विद्यार्थ्याला संगणकाद्वारे परीक्षा द्यावयाची असल्यास स्क्रीन रिडींग सॉफटवेअर असलेल्या संगणक NVDA Software / Super Nova तसेच वेळोवेळी अद्यावत ICT तंत्राचा वापर करता येईल. परंतु, त्यासाठी विभागीय मंडळाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक राहील. (शाळेने याबाबतचा पत्रव्यवहार करणे आवश्यक आहे.)

१.१३ महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक मंडळ विनियम, १९७७ मधील विनयिम क्र. ९९ व विनियम क्र. ५२ नुसार सवलतीचे गुण फक्त नियमित व सर्व ६ विषय घेऊन प्रविष्ट होणाऱ्या विद्यार्थ्यांनाच देय राहील.

१.१४ मुलांच्या गरजेप्रमाणे त्यांना अनुकूल असलेले फेरबदल प्रश्नपत्रिकेत करण्यात यावे. (इयत्ता १ ली ते इयत्ता ९ साठी)

**(२) कुष्ठरोगातून बरे झालेले निवारित (Leprosy Cured Persons) विद्यार्थ्यांसाठी:-**

२.१ विद्यार्थ्यांच्या सोयीनुसार जवळचे परीक्षा केंद्र देय राहील (विद्यार्थी ज्या शाळेत शिक्षण घेत आहेत, ती शाळा किंवा घराजवळची शाळा).

२.२ या विद्यार्थ्यांना परीक्षेचा पेपर सोडविण्यासाठी प्रतितास २० मिनिटे अधिक वेळ देय राहील.

२.३ अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना कमाल २० गुणांची सवलत एकाच विषयामध्ये किंवा सर्व विषयांमध्ये विभागून देण्यात यावी.

२.४ वैद्यकिय प्रमाणपत्रानुसार लेखनिकाची गरज असल्यास लेखनिक घेण्याची परवानगी देण्यात यावी.

२.५ शिकत असलेल्या शाळा / महाविद्यालयातच शरीराची योग्य स्थिती आणि बसण्याच्या व्यवस्थेसाठी अनुकूल तयार केलेले टेबल, टायपिंग मशीन / संगणक, खुर्च्या यांची या विद्यार्थ्यांसाठी व्यवस्था करण्यात यावी.

**(३) कर्णबधीर विद्यार्थ्यांसाठी:-**

३.१ विद्यार्थ्यांच्या सोयीनुसार जवळचे परीक्षा केंद्र देय राहील (विद्यार्थी ज्या शाळेत शिक्षण घेत आहेत, ती शाळा किंवा घराजवळची शाळा).

३.२ या विद्यार्थ्यांना परीक्षेचा पेपर सोडविण्यासाठी प्रतितास २० मिनिटे अधिक वेळ देय राहील.

३.३ अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना कमाल २० गुणांची सवलत एकाच विषयामध्ये किंवा सर्व विषयांमध्ये विभागून देण्यात यावी.

३.४ महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक मंडळ विनियम, १९७७ मधील विनयिम क्र. ९९ व विनियम क्र. ५२ नुसार सवलतीचे गुण फक्त नियमित व सर्व ६ विषय घेऊन प्रविष्ट होणाऱ्या विद्यार्थ्यांनाच देय राहील.

३.५ प्रश्नाचे उत्तर अपेक्षित शब्द मर्यादेपेक्षा कमी शब्द मर्यादेत लिहिता येईल. दिर्घोत्तरी प्रश्नांची उत्तरे मुद्यांमध्ये लिहिता येतील. दिर्घोत्तरी प्रश्नांमध्ये मुख्य मुद्यांच्या अनुषंगाने (Key Points) उत्तरे लिहिल्यास परीक्षकांनी उत्तरामध्ये थोडक्यात विषयाच्या अनुषंगाने माहिती / उत्तरे दिली आहेत का, ते तपासून गुणदान करावे.

३.६ या मुलांसाठी स्पेलिंग, व्याकरण, विराम चिन्हे चुकांबाबत गुणदान कमी करण्यात येऊ नये.

३.७ मौखिक मूल्यमापनासाठी लेखीचा पर्याय देण्यात यावा.

३.८ परीक्षेसाठी सर्व मौखिक मार्गदर्शक सूचना फलकावर लिहून देण्यात याव्यात.

३.९ मुलांच्या गरजेप्रमाणे त्यांना अनुकूल असलेले फेरबदल प्रश्नपत्रिकेत करण्यात यावे. (इयत्ता १ ली ते इयत्ता ९ साठी)

**(४) अस्थिव्यंग विद्यार्थ्यांसाठी:-**

**४.१** विद्यार्थ्यांच्या सोयीनुसार जवळचे परीक्षा केंद्र देय राहील (विद्यार्थी ज्या शाळेत शिक्षण घेत आहेत, ती शाळा किंवा घराजवळची शाळा).

४.२ या विद्यार्थ्यांना परीक्षेचा पेपर सोडविण्यासाठी प्रतितास २० मिनिटे अधिक वेळ देय राहील.

४.३ अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना कमाल २० गुणांची सवलत एकाच विषयामध्ये किंवा सर्व विषयांमध्ये विभागून देण्यात यावी.

४.४ वैद्यकिय प्रमाणपत्रानुसार लेखनिकाची गरज असल्यास लेखनिक घेण्याची परवानगी देण्यात यावी.

४.५ शाळा व कनिष्ठ महाविद्यालयातच शरीराची योग्य स्थिती आणि बसण्यासाठी अनुकूल असे तयार केलेले टेबल, टायपिंग मशीन / संगणक खुर्च्या यांची या विद्यार्थ्यांसाठी व्यवस्था करावी लागेल. त्यासाठी संबंधित शाळा व कनिष्ठ महाविद्यालयाने शिक्षण मंडळाची मान्यता/पूर्वपरवानगी घ्यावी.

४.६ महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक मंडळ विनियम, १९७७ मधील विनयिम क्र. ९९ व विनियम क्र. ५२ नुसार सवलतीचे गुण फक्त नियमित व सर्व ६ विषय घेऊन प्रविष्ट होणाऱ्या विद्यार्थ्यांनाच देय राहील.

४.७ आकृत्या, नकाशे, तक्ते इ. काढण्यासाठी सवलत देय राहील.

४.८ प्रात्यक्षिक परीक्षेऐवजी या विद्यार्थ्यांना या विषयाची तोंडी परीक्षा/बहुपर्यायी उत्तरे असलेली लेखी परीक्षा (प्रात्यक्षिकांवर आधारित) देता येईल. तोंडी परीक्षेत प्रात्यक्षिकांवर आधारित प्रश्न विचारले जावेत.

४.९ अनुकूलनशील साहित्य आणि उपकरणांचा वापर करु देण्यात यावा. उदा. पेन्सिल व ग्रीप्स.

**(५) शारीरिक वाढ खुंटणे (Dwarfism):**

५.१ विद्यार्थ्यांच्या सोयीनुसार जवळचे परीक्षा केंद्र देय राहील (विद्यार्थी ज्या शाळेत शिक्षण घेत आहेत, ती शाळा किंवा घराजवळची शाळा).

५.२ या विद्यार्थ्यांना परीक्षेचा पेपर सोडविण्यासाठी प्रतितास २० मिनिटे अधिक वेळ देय राहील.

५.३ अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना कमाल २० गुणांची सवलत एकाच विषयामध्ये किंवा सर्व विषयांमध्ये विभागून देण्यात यावी.

५.४ वैद्यकिय प्रमाणपत्रानुसार लेखनिकाची गरज असल्यास लेखनिक घेण्याची परवानगी देण्यात यावी.

५.५ शाळा व कनिष्ठ महाविद्यालयातच शरीराची योग्य स्थिती आणि बसण्यासाठी अनुकूल असे तयार केलेले टेबल, टायपिंग मशीन / संगणक खुर्च्या यांची या विद्यार्थ्यांसाठी व्यवस्था करावी लागेल.

**(६) बौध्दिक अक्षम (मतिमंद) (Intellectual Disability-Mentally challenged):**

६.१ विद्यार्थ्यांच्या सोयीनुसार जवळचे परीक्षा केंद्र देय राहील (विद्यार्थी ज्या शाळेत शिक्षण घेत आहेत, ती शाळा किंवा घराजवळची शाळा).

६.२ या विद्यार्थ्यांना परीक्षेचा पेपर सोडविण्यासाठी प्रतितास २० मिनिटे अधिक वेळ देय राहील.

६.३ अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना कमाल २० गुणांची सवलत एकाच विषयामध्ये किंवा सर्व विषयांमध्ये विभागून देण्यात यावी.

६.४ वैद्यकिय प्रमाणपत्रानुसार लेखनिकाची गरज असल्यास लेखनिक घेण्याची परवानगी देण्यात यावी.

६.५ आवश्यकतेनुसार प्रौढ लेखनिक देण्यात यावा.

६.६ शालेय स्तरावर इयत्ता १ ली ते ९ वी ही सुविधा गरजेनुसार व इयत्ता १० वी व १२ वी परीक्षेत प्रविष्ठ होणाऱ्या विद्यार्थ्यांना गणित सर्व शाखा, पुस्तक पालन लेखाकर्म, भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र या विषयांसाठी गणकयंत्र (Calculator) वापरण्याची इच्छा असेल तर कॅलक्युलेटर वापरता येईल. (शालेय स्तरावर या साहित्याची गरज भासते)

६.७ शाळा व कनिष्ठ महाविद्यालयातच शरीराची योग्य स्थिती आणि बसण्यासाठी अनुकूल असे तयार केलेले टेबल, टायपिंग मशिन, खुर्च्या यांची या विद्यार्थ्यांसाठी व्यवस्था करावी लागेल.

६.८ प्रात्यक्षिक परीक्षेऐवजी त्या विद्यार्थ्यांना त्या विषयाची तोंडी परीक्षा/ बहुपर्यायी उत्तरे असलेली लेखी परीक्षा (प्रात्यक्षिकांवर आधारित) देता येईल. तोंडी परीक्षेत प्रात्यक्षिकांवर आधारित प्रश्न विचारले जावेत.

६.९ या गटात मोडणाऱ्या अनेक विद्यार्थ्यांची कारक कौशल्ये अविकसित असतात, याचा विचार करून त्यांना अनुकूलित (Adaptive) सुलभ वेगळ्या प्रकारची पेन्सिल, पेन, ग्रीपर वापरण्याची परवानगी द्यावी.

६.१० महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक मंडळ विनियम, १९७७ मधील विनयिम क्र. ९९ व विनियम क्र. ५२ नुसार सवलतीचे गुण फक्त नियमित व सर्व ६ विषय घेऊन प्रविष्ट होणाऱ्या विद्यार्थ्यांनाच देय राहील.

६.११ विद्यार्थ्यांना आकृत्या, नकाशे इ.काढण्यासाठी सवलत देय राहील, याचे गुण त्या विद्यार्थ्याला प्रमाणात देण्यात येतील.

६.१२ प्रश्नपत्रिकेतील भाषा सरळ व सोपी असावी (इयत्ता १ली ते ९ वी साठी).

६.१३ मूल्यमापन प्रक्रियेसाठी योग्य अध्ययन अध्यापन साहित्य वापरण्याची लवचिकता देण्यात यावी.

६.१४ पूर्ण विराम, स्पेलिंग, व्याकरण, विराम चिन्हे चुकांबाबत गुणदान कमी करण्यात येऊ नये.

६.१५ मुलांच्या गरजेप्रमाणे त्यांना अनुकूल असलेले फेरबदल प्रश्नपत्रिकेत करण्यात यावे. (इयत्ता १ ली ते इयत्ता ९ साठी)

**<u>(७) बहुविकलांग विद्यार्थ्यांसाठी:-</u>**

७.१ विद्यार्थ्यांच्या सोयीनुसार जवळचे परीक्षा केंद्र देय राहील (विद्यार्थी ज्या शाळेत शिक्षण घेत आहेत, ती शाळा किंवा घराजवळची शाळा).

७.२ या विद्यार्थ्यांना परीक्षेचा पेपर सोडविण्यासाठी प्रतितास २० मिनिटे अधिक वेळ देय राहील.

७.३ अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना कमाल २० गुणांची सवलत एकाच विषयामध्ये किंवा सर्व विषयांमध्ये विभागून देण्यात यावी.

७.४ वैद्यकिय प्रमाणपत्रानुसार लेखनिकाची गरज असल्यास लेखनिक घेण्याची परवानगी देण्यात यावी.

७.५ आवश्यकतेनुसार प्रौढ लेखनिक देण्यात यावा.

७.६ शालेय स्तरावर इयत्ता १ ली ते ९ वी ही सुविधा गरजेनुसार व इयत्ता १० वी व १२ वी परीक्षेत प्रविष्ठ होणाऱ्या विद्यार्थ्यांना गणित सर्व शाखा, पुस्तक पालन लेखाकर्म, भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र या विषयांसाठी गणकयंत्र (Calculator) वापरण्याची इच्छा असेल तर कॅलक्युलेटर वापरता येईल. (शालेय स्तरावर या साहित्याची गरज भासते)

७.७ शाळा व कनिष्ठ महाविद्यालयातच शरीराची योग्य स्थिती आणि बसण्यासाठी अनुकूल असे तयार केलेले टेबल, टायपिंग मशीन, खुर्च्या यांनी या विद्यार्थ्यांसाठी व्यवस्था करावी लागेल. त्यासाठी संबंधित शाळा व कनिष्ठ महाविद्यालयाने शिक्षण मंडळाची मान्यता / पूर्वपरवानगी घ्यावी.

७.८ महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक मंडळ विनियम, १९७७ मधील विनयिम क्र. ९९ व विनियम क्र. ५२ नुसार सवलतीचे गुण फक्त नियमित व सर्व ६ विषय घेऊन प्रविष्ट होणाऱ्या विद्यार्थ्यांनाच देय राहील.

७.९ आकृत्या, नकाशे इ. काढण्यासाठी सवलत देय राहील. याचे गुण त्या विद्यार्थ्याला प्रमाणात देण्यात येतील.

७.१० विज्ञान व तंत्रज्ञान पेपर १ व २ या विषयांच्या प्रात्यक्षिक परीक्षेऐवजी तोंडी परीक्षा देता येईल. तोंडी परीक्षेत प्रयोगांवर आधारित प्रश्न विचारले जावेत.

७.११ मुलांच्या अध्ययन शैलीनुसार व गरजेप्रमाणे त्यांना अनुकूल असणारे फेरबदल करून प्रश्नपत्रिका तयार करण्यात याव्यात (फक्त इयत्ता १ली ते ९वी साठी).

७.१२ बहुविकलांग मुलांना अतिरिक्त सूचना किंवा संकेताची गरज भासते, तेव्हा परीक्षेच्या वेळ बैठकीची वेगळी व्यवस्था असावी. आवश्यकतेनुसार दुभाषक / वाचक देण्यात यावा

७.१३ प्रात्यक्षिक परीक्षेऐवजी या विद्यार्थ्यांना या विषयाची तोंडी परीक्षा/बहुपर्यायी उत्तरे असलेली लेखी परीक्षा (प्रात्यक्षिकांवर आधारित) देता येईल. तोंडी परीक्षेत प्रात्यक्षिकांवर आधारित प्रश्न विचारले जावेत.

७.१४ अनुकूलनशील साहित्य आणि उपकरणांचा वापर करू देण्यात यावा. उदा. पेन्सिल व ग्रीप्स.

<u>(८) मानसिक आजार (Mental Illness):-</u>

८.१ विद्यार्थ्यांच्या सोयीनुसार जवळचे परीक्षा केंद्र देय राहील (विद्यार्थी ज्या शाळेत शिक्षण घेत आहेत, ती शाळा किंवा घराजवळची शाळा).

८.२ या विद्यार्थ्यांना परीक्षेचा पेपर सोडविण्यासाठी प्रतितास २० मिनिटे अधिक वेळ देय राहील.

८.३ अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना कमाल २० गुणांची सवलत एकाच विषयामध्ये किंवा सर्व विषयांमध्ये विभागून देण्यात यावी.

८.४ वैद्यकिय प्रमाणपत्रानुसार लेखनिकाची गरज असल्यास लेखनिक घेण्याची परवानगी देण्यात यावी.

८.५ आवश्यकतेनुसार प्रौढ लेखनिक देण्यात यावा.

८.६ शालेय स्तरावर इयत्ता १ ली ते ९ वी ही सुविधा गरजेनुसार व इयत्ता १० वी व १२ वी परीक्षेत प्रविष्ठ होणाऱ्या विद्यार्थ्यांना गणित सर्व शाखा, पुस्तक पालन लेखाकर्म, भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र या विषयांसाठी गणकयंत्र (Calculator) वापरण्याची इच्छा असेल तर कॅलक्युलेटर वापरता येईल. (शालेय स्तरावर या साहित्याची गरज भासते)

८.७ शाळा व कनिष्ठ महाविद्यालयातच बसण्यासाठी अनुकुलित वातावरणात टेबल, टायपिंग मशीन, खुर्च्या यांची या विद्यार्थ्यांसाठी व्यवस्था करावी लागेल.

८.८ या विद्यार्थ्यांची परीक्षा स्वतंत्र वर्गात घेण्यात यावी. (वैद्यकिय प्रमाणपत्रानुसार गरज असल्यास)

८.९ विद्यार्थी अचानक आक्रमक / हिंसक बनला तर परिस्थिती हाताळू शकेल, असाच पर्यवेक्षक नेमावा.

<u>(९) ऑटिस्टिक (स्वमग्न) विद्यार्थ्यांसाठी:-</u>

९.१ विद्यार्थ्यांच्या सोयीनुसार जवळचे परीक्षा केंद्र देय राहील (विद्यार्थी ज्या शाळेत शिक्षण घेत आहेत, ती शाळा किंवा घराजवळची शाळा).

९.२ या विद्यार्थ्यांना परीक्षेचा पेपर सोडविण्यासाठी प्रतितास २० मिनिटे अधिक वेळ देय राहील.

९.३ अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना कमाल २० गुणांची सवलत एकाच विषयामध्ये किंवा सर्व विषयांमध्ये विभागून देण्यात यावी.

९.४ वैद्यकिय प्रमाणपत्रानुसार लेखनिकाची गरज असल्यास लेखनिक घेण्याची परवानगी देण्यात यावी.

९.५ आवश्यकतेनुसार प्रौढ लेखनिक देण्यात यावा.

९.६ शालेय स्तरावर इयत्ता १ ली ते ९ वी ही सुविधा गरजेनुसार व इयत्ता १० वी व १२ वी परीक्षेत प्रविष्ठ होणाऱ्या विद्यार्थ्यांना गणित सर्व शाखा, पुस्तक पालन लेखाकर्म, भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र या विषयांसाठी गणकयंत्र (Calculator) वापरण्याची इच्छा असेल तर कॅलक्युलेटर वापरता येईल. (शालेय स्तरावर या साहित्याची गरज भासते)

९.७ शाळा व कनिष्ठ महाविद्यालयातच शरीराची योग्य स्थिती आणि बसण्यासाठी अनुकूल असे तयार केलेले टेबल, टायपिंग मशीन, खुर्च्या यांची या विद्यार्थ्यांसाठी व्यवस्था करावी लागेल. त्यासाठी संबंधित शाळा व कनिष्ठ महाविद्यालयाने शिक्षण मंडळाची मान्यता/पूर्वपरवानगी घ्यावी.

९.८ विद्यार्थ्यांच्या सुरक्षिततेसाठी त्याला खात्री वाटेल, अशा व्यक्तीस परीक्षा वर्गाजवळ उपस्थित राहण्याची परवानगी देण्यात यावी.

९.९ विद्यार्थ्यांना आकृत्या, नकाशे / तक्ते इ. काढण्याची सवलत देण्यात येईल. त्याचे गुण त्या विद्यार्थ्याला त्या प्रमाणात देण्यात येतील.

९.१० प्रात्यक्षिक आणि प्रकल्प परीक्षेस विद्यार्थ्यांना या विषयाची तोंडी परीक्षा/बहुपर्यायी उत्तरे असलेली लेखी परीक्षा (प्रात्यक्षिकांवर आधारित) देता येईल. तोंडी परीक्षेत प्रात्यक्षिकांवर आधारित प्रश्न विचारले जावेत.

९.११ मौखिक मूल्यमापनासाठी लेखीचा पर्याय देण्यात यावा.

९.१२ आवश्यकतेनुसार वाचनिक/Prompter (सूचक) देण्यात यावा.

९.१३ प्रश्नाचे उत्तर अपेक्षित शब्द मर्यादेपेक्षा कमी शब्द मर्यादेत लिहिता येईल. दिर्घोत्तरी प्रश्नांची उत्तरे मुद्यांमध्ये (Key Points) लिहिता येतील. दिर्घोत्तरी प्रश्नांमध्ये मुख्य मुद्याच्या अनुषंगाने उत्तर दिल्यास परीक्षकांनी परीक्षेतील उत्तरामध्ये थोडक्यात विषयाच्या अनुषंगाने माहिती / उत्तरे दिली आहेत का ते तपासून गुणदान करावे.

९.१४ या विद्यार्थ्यांची परीक्षा स्वतंत्र वर्गात घेण्यात यावी.

९.१५ अचानक उपचार करावे लागतील, अशी स्थिती उत्पन्न झाल्यास किंवा परीक्षेच्या कालावधीतच उपचारासाठी हॉस्पिटलमध्ये दाखल व्हावे लागल्यास, अशा विद्यार्थ्यांच्या भविष्याचा विचार करुन त्यांना पुन:परीक्षेची (Re-Exam) परवानगी देण्यात यावी. विषय शिक्षक, महाविद्यालयाचे प्राचार्य व परीक्षा विभागाचे प्रमुख यांनी यासाठी समन्वय साधावा.

९.१६ या गटात मोडणाऱ्या अनेक विद्यार्थ्यांची कारक कौशल्य अविकसित असतात, त्याचा विचार करुन त्यांना वेगळ्या प्रकारची पेन्सिल, पेन, ग्रीपर वापरण्याची परवानगी देण्यात यावी.

९.१७ महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक मंडळ विनियम, १९७७ मधील विनयिम क्र. ९९ व विनियम क्र. ५२ नुसार सवलतीचे गुण फक्त नियमित व सर्व ६ विषय घेऊन प्रविष्ट होणाऱ्या विद्यार्थ्यांनाच देय राहील.

९.१८ विद्यार्थ्यांना उत्तरपत्रिका टाईप करुन वा लिहून देण्याची परवानगी देण्यात यावी.

९.१९ या मुलांसाठी स्पेलिंग, व्याकरण, विराम चिन्हे चुकांबाबत गुणदान कमी करण्यात येऊ नये.

९.२० परीक्षेसाठी सर्व मौखिक मार्गदर्शक सूचना फलकावर लिहून देण्यात याव्यात.

९.२१ मुलांच्या गरजेप्रमाणे त्यांना अनुकूल असलेले फेरबदल प्रश्नपत्रिकेत करण्यात यावे. (इयत्ता १ ली ते इयत्ता ९ साठी)

**<u>(१०) सेरेबल पाल्सी विद्यार्थ्यांसाठी :-</u>**

१०.१ विद्यार्थ्यांच्या सोयीनुसार जवळचे परीक्षा केंद्र देय राहील (विद्यार्थी ज्या शाळेत शिक्षण घेत आहेत, ती शाळा किंवा घराजवळची शाळा).

१०.२ या विद्यार्थ्यांना परीक्षेचा पेपर सोडविण्यासाठी प्रतितास २० मिनिटे अधिक वेळ देय राहील.

१०.३ अनुत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांना कमाल २० गुणांची सवलत एकाच विषयामध्ये किंवा सर्व विषयांमध्ये विभागून देण्यात यावी.

१०.४ वैद्यकिय प्रमाणपत्रानुसार लेखनिकाची गरज असल्यास लेखनिक घेण्याची परवानगी देण्यात यावी.

१०.५ आवश्यकतेनुसार प्रौढ लेखनिक देण्यात यावा.

